जालना येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करण्याकरिता पर्यायी जागा उपलब्ध करून देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

शासन निर्णय क्रमांकः एमईडी-२०२४/प्र.क्र.६१/२४/शिक्षण-१

९ वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.

दिनांक: २३.०८. २०२४

वाचा :-

१) मा.मंत्रीमंडळाच्या दि.२८.०६.२०२३ रोजीच्या बैठकीतील निर्णय
२) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्रमांकः एमईडी-२०२२/प्र.क्र.२२९/२२/ शिक्षण-१ , दि. १४.०७.२०२३
३) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, संशोधन व आयुष, मुंबई यांचे पत्र क्र. DMER-१२०११/५/२०२३-EDU, दि.१८.०१.२०२४

<u>प्रस्तावना :</u>

राज्यातील पालघर, ठाणे (अंबरनाथ), जालना, अमरावती, बुलढाणा, वाशिम, वर्धा, भंडारा आणि गडचिरोली या शासकीय वैद्यकीय महाविद्यालय नसणाऱ्या जिल्ह्यांमध्ये प्रत्येकी १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करण्याच्या प्रस्तावास दिनांक २८.०६.२०२३ रोजी मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली असून त्यानुषंगाने दिनांक १४.०७.२०२३ रोजी शासन निर्णय निर्गमित केला आहे.

२. उपरोक्त जिल्ह्यांपैकी जालना येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रूग्णालयाकरिता मौजे जालना येथील सर्व्हे नं. २०४/१ मधील २५ एकर शासकीय जमीन महसूल विभागामार्फत वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास नि:शुल्क हस्तांतरीत करण्यास मा.मंत्रिमंडळाने उक्त बैठकीत मान्यता दिली आहे. तथापि सदर जमीन उपलब्ध करून देण्यास वन विभाग तसेच शहर नगर रचना विभागाने अडचणी असल्याचे निदर्शनास आणले होते. त्यानुषंगाने जालना येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रूग्णालयाकरिता सुयोग्य असलेल्या पर्यायी शासकीय जमीनीची पाहणी करण्यात आली असून त्याबाबतचा अहवाल संदर्भ-३ येथील पत्रान्वये आयुक्त, वैद्यकीय शिक्षण यांनी सादर केला आहे.

३. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण यांनी सादर केलेल्या अहवालाच्या आधारे जालना येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ४३० रुग्णखाटांचे

रुग्णालय स्थापन करण्याकरिता नव्याने पर्यायी जागा उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे सुधारित आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय:-**

१. जालना येथे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालय स्थापन करण्याच्या प्रयोजनार्थ शासन निर्णय दि.१४.०७.२०२३ अन्वये नमूद "मौजे जालना येथील सर्व्हे नं. २०४/१ मधील २५ एकर शासकीय जागा" या जागेऐवजी "मौजे गणेशनगर, ता. जि. जालना येथील गट क्र. ५४ मधील खाते क्र.२०१ मधील ५१.४१ हे. आर. इतक्या जमिनीपैकी १०.४० हे. आर. (२६ एकर)" ही महसूल विभागाच्या अखत्यारीतील जागा महसूल विभागामार्फत वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास नि:शुल्क हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. जालनासह इतर आठ जिल्ह्यांमध्ये १०० विद्यार्थी प्रवेशक्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालय स्थापन करण्यासंदर्भात यापूर्वी शासन निर्णय दि.१४.०७.२०२३ अन्वये केलेल्या इतर तरतूदी कायम राहतील.

३. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई यांनी या संदर्भातील कार्यवाही तातडीने पूर्ण करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२३१२५०३७३६१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D025934340956DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2024.08.23 18:24:29 +05'30'

**(अजित सासुलकर)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
८. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
९. सचिव, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार, निर्माण भवन, नवी दिल्ली.

१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष, मुंबई.
१३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
१५. कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
१६. जिल्हाधिकारी, जालना.
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ / २ महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
१९. जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, जालना
२०. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जालना
२१. सर्व सह सचिव/उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. अवर सचिव (प्रशा. - २), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. कक्ष अधिकारी (शिक्षण-२), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. निवडनस्ती (शिक्षण-१).